**ग्रामीण रुग्णालय, चिखलदरा, जि.अमरावती येथील इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१४/प्र.क्र. १८३/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १० नोव्हेंबर, २०१४.

**शासन निर्णय :**

ग्रामीण रुग्णालय, चिखलदरा, जि.अमरावती येथील इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या रुपये ९६,७३,४४७/- एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. ग्रामीण रुग्णालय, चिखलदरा, जि.अमरावती येथील इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाचे अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर अंदाजपत्रकातील प्राईस व्हेरिएशन चार्जेस वगळण्यात येऊन, ७ टक्के विद्युतीकरण, ३ टक्के पाणी पुरवठा व मलनिस्सारण, ४ टक्के आकस्मिक खर्च, १.१२ टक्के कन्सल्टन्सी फी, ४ टक्के सेंटेज चार्जेस याप्रमाणे तरतुदी योग्य करण्यात येऊन रुपये ९२,०९,६००/- (रक्कम अक्षरी रुपये ब्याण्णव लक्ष नऊ हजार सहाशे फक्त) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

१) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्रमांक- इएनव्ही २०१३/प्र.क्र. १७७/तां.क. १, दिनांक १०.१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

२) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

५) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या-त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

६) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.

३. ग्रामीण रुग्णालय, चिखलदरा, जि.अमरावती येथील इमारत दुरुस्ती व नुतनीकरणावरील खर्च राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाच्या माध्यमातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक- २७५/इमा-३, दिनांक २१.७.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीने आणि शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र १०००/प्र.क्र. ४६/विनियम, दिनांक ११.७.२००१ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१३०३४२४२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chavan Suhas R

Digitally signed by Chavan Suhas R
DN: CN = Chavan Suhas R, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.11.10 16:42:04 +05'30'

**( सुहास रा. चव्हाण )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
६. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, चिखलदरा, जि.अमरावती.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर, जि.अमरावती.
१०. उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, धारणी, जि.अमरावती.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.अमरावती.
१२. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (आरोग्य-३).